**सांगली जिल्हयातील कवठे पिराण, ऊरुण इस्लामपूर, आष्टा, कसबे डिग्रज व बोरगाव या गावांतील क्षारपड खराबा क्षेत्राची सुधारणा करणेसाठी पथदर्शी भूमिगत चर योजनेस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्र. सीडीए-२०२१/प्र.क्र. ३७/२१/लाक्षेवि (कामे) (भाग-२)**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २४/०१/२०२२

**वाचा** : १. जलसंपदा विभागाचा शासन निर्णय क्र. सिडीए-२०१८/प्र.क्र. १५२/१८/लाक्षेवि (कामे), दि. २१ /०७/२०२०.

२. जलसंपदा विभागाचा शासन निर्णय क्र. सीडीए-२०२१/प्र.क्र. ३७/२१/लाक्षेवि (कामे), दि. २३ जून,२०२१.

३. मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मुअ (जस)/काअ-२/उअ-५/ प्रशा ७/३२९१/२०२१, दि. १६ जुलै, २०२१.

**प्रस्तावना :-**

क्षारपड जमिनींचा पोत सुधारण्यासाठी खराबा व क्षारपड क्षेत्राचे निर्मुलन करण्यासाठी सांगली जिल्हयातील खाली नमूद ५ गावांच्या पथदर्शी भूमिगत चर योजनेस (Sub Surface Drainage Scheme) जलसंपदा विभागाकडील शासन निर्णय दि. २१/०७/२०२० चे पालन होईल या अटीच्या अधीन राहून या विभागाच्या दि. २३ जून, २०२१ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

| अ. क्र. | चर योजनेचे नांव | बाधित क्षेत्र (हेक्टर) | कामाप्रित्यर्थ अंदाजित रक्कम ( रु. कोटी) | अनुषंगिक खर्चाची अपेक्षित (१% - Insurance, १२% - GST, ३% - Contingencies, व २% W. C. Establishment, इ.) रक्कम (रु. कोटी) | एकूण प्रशासकीय मान्यतेची अंदाजित किंमत (रु. कोटी) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कवठे पिराण | १२२७.४४ | १७.५३ | ३.०२ | २०.५५ |
| २ | ऊरुण इस्लामपूर | ८४०.८० | १२.१७ | २.०७ | १४.२४ |
| ३ | आष्टा | ६९९.८४ | ९.००२ | १.५३ | १०.५३ |
| ४ | कसबे डिग्रज | ४७१.८८ | ६.१४ | १.०४ | ७.१८ |
| ५ | बोरगाव | १७३.७३ | २.०२ | ०.३४ | २.३६ |

भूमिगत चर योजनेच्या सविस्तर अंदाजपत्रकांत भूमिगत चर योजनेचे बांधकामाचे मुख्यचर (Main Drain), सच्छिद्र नलिका (Laterals) व उप मुख्य नलिका (Collectors) असे तीन मुख्य घटक आहेत. मात्र वरील प्रशासकिय मान्यता ही भूमिगत चर योजनेच्या फक्त Laterals व Collectors च्या तरतुदींना प्रदान करण्यात आलेली आहे.

दि. २१ ते २३ जुलै, २०२१ रोजी झालेल्या महापूराच्या दरम्यान सर्व नैसर्गिक नाले, ओढे व प्रवाह गाळाने भरल्याने मुख्यचर (Main Drain) उघडया प्रकारची ठेवल्यास भूमिगत चराचे पाणी पुन्हा शेतात येईल असे लक्षात आले आहे. त्यामुळे सच्छिद्र नलिका (Laterals) मधील पाणी उप मुख्य नलिका (Collectors) मध्ये आल्यानंतर ते पाणी मुख्य पाईपच्या बंद नलिकेतून नदीत सोडले तरच पाण्याचा निचरा होईल व पाणी शेतातून बाहेर पडेल. त्यामुळे सदर घटकांचे तांत्रिकदृष्टया पृथ्थकरण केले असता भूमिगत चर योजनेचे Field Laterals, Collectors व Main Drain (मुख्यचर) असे तीन मुख्य घटकांचे काम एकत्रित पध्दतीने करणे आवश्यक आहे, असे निदर्शनास आले आहे. त्यामुळे सांगली जिल्हयातील प्रस्तावित कवठे पिराण, ऊरुण इस्लामपूर, आष्टा, कसबे डिग्रस व बोरगांव या ५ गावांमध्ये पथदर्शी भूमिगत चर योजना (Sub Surface Drainage Scheme) राबविण्यासाठी Field Laterals, Collectors व Main Drain (मुख्यचर) असे तीन मुख्य घटकांच्या बाबींसहीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक आहे.

सदरची बाब विचारात घेवून, मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे यांनी सांगली जिल्हयातील वर नमूद ५ गावांच्या पथदर्शी भूमिगत चर योजनेचे (Sub Surface Drainage Scheme) बांधकामाचे Field Laterals, Collectors व Main Drain असे तीन मुख्य घटकांसह प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याच्या अनुषंगाने सविस्तर प्रस्ताव दि. १६ जुलै, २०२१ च्या पत्रान्वये शासनास सादर केलेला आहे. त्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१) क्षारपड जमिनींचा पोत सुधारण्यासाठी खराबा व क्षारपड क्षेत्राचे निर्मुलन करण्यासाठी सांगली जिल्हयातील ५ गावांच्या पथदर्शी भूमिगत चर योजनांच्या (Sub Surface Drainage Scheme) प्रशासकीय मान्यता दिलेला दि. २३ जून, २०२१ रोजी शासन निर्णय अधिक्रमित करुन, पथदर्शी भूमिगत चर योजनेचे (Sub Surface Drainage Scheme) बांधकामाचे मुख्यचर (Main Drain), सच्छिद्र नलिका (Laterals) व उप मुख्य नलिका (Collectors) असे तीन मुख्य घटक समाविष्ठ असलेल्या सांगली जिल्हयातील खालील नमूद ५ गावांच्या रु. ९३.७६ कोटी (अक्षरी रु. त्र्याण्णव कोटी शहात्तर लक्ष फक्त ) च्या पथदर्शी भूमिगत चर योजनेस (Sub Surface Drainage Scheme) खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) जलसंपदा विभागाच्या शासन निर्णय, दि. २१/०७/२०२० चे पालन होईल

ब) तसेच सदर कामे पूर्ण केल्यानंतर या क्षारपड जमिनीची सुधारणा झाल्यानंतर या जमिनी अकृषक (N.A.) रुपांतरीत केल्या जाणार नाहीत

क) या जमिनीवर शेती करण्यासाठी सूक्ष्म सिंचन (Drip / Sprinkler ) या पध्दतीचा अवलंब केला जाईल

२. सदर पथदर्शी प्रकल्पावर अंदाजित खर्चाचे आकडेवारी खालील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | चर योजनेचे नांव | बाधीत क्षेत्र (हेक्टर) | कामाप्रित्यर्थ अंदाजित किंमत रु. कोटी | अनुषंगिक खर्च किंमत रु. कोटी | प्रशासकिय मान्यतेसाठी प्रस्तावित अंदाजित एकूण रक्कम किंमत रु. कोटी (६ = ४+५) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | कवठे पिराण | १५९८.१४ | ३१.१० | ७.१९ | **३८.२८** |
| २ | ऊरुण इस्लामपूर | ८४०.८० | १६.१६ | ३.७४ | **१९.८९** |
| ३ | आष्टा | ६९९.८४ | ११.९० | २.७५ | **१४.६४** |
| ४ | कसबे डिग्रज | ७५२.५२ | ८.८२ | २.०४ | **१०.८६** |
| ५ | बोरगाव | ४८९.१८ | ८.१७ | १.८९ | **१०.०५** |
| | एकण | ४३८०.४८ | ७६.१५ | १७.६१ | **९३.७२** |

यानुसार सदर पथदर्शी प्रकल्पास निव्वळ कामाप्रित्यर्थ रुपये ७६.१५ कोटी रुपये श्याहात्तर कोटी पंधरा लक्ष ) व अनुषंगीक खर्चापोटी रुपये १७.६१ कोटी (रुपये सतरा कोटी ऐकसष्ठ लक्ष ) असे एकूण रु. ९३.७२ कोटी (एकूण रुपये त्र्याण्णव कोटी बहात्तर लक्ष) अंदाजित किंमती करीता अटीनाधीन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेतील कामासाठी शासनाच्या हिश्श्यापोटी होणारा खर्च “ ४७११ (२७९४) (०२) जलनिस्सारण कामे (०२) (०३) बिगर लाभक्षेत्र विकास प्राधिकरणांतर्गत जलनिस्सारण प्रकल्प (कार्यक्रम) ” या लेखाशीर्षाखाली करावा.

३. सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.२०८/२०२१, दि. २४/१२/२०२१ तसेच वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र.२३/२०२२, दि. २४/०१/२०२२ नुसार मिळालेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या कामांना प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) या कार्यासनाच्या नोंदवही सन २०२१-२२ मध्ये अ.क्र. ४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०१२४१४५९०८६५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PURNIMA DEVANG DESAI

Digitally signed by PURNIMA DEVANG DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=949e11d9f47452e1756c38e35b6f35f56ed936d055f1ff2c622aef6d98ab6f45, pseudonym=F2EE5DB2EAD70020050F89A04FDEE4D600CFC629, serialNumber=4EBE868A2B44904EFA132127F4DE695C80797533C7F4FB249598B0F90102629B, cn=PURNIMA DEVANG DESAI
Date: 2022.01.24 15:01:15 +05'30'

**( पूर्णिमा देसाई )**

**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई - ३२.

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.

३) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई - ३२
४) मा. सभापती,/ उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई - ३२.
५) मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
६) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई - ३२.
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई - ३२.
८) मा. मंत्री/राज्यमंत्री, जलसंपदा विभाग यांचे खाजगी सचिव
९) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) अप्पर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
११) महालेखापाल (महालेखापरीक्षा), महाराष्ट्र - १ / महाराष्ट्र - २, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र - १ / महाराष्ट्र - २, नागपूर.
१३) अप्पर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) कार्यकारी संचालक, सर्व पाटबंधारे विकास महामंडळ.
१६) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, पुणे
१७) आंतरवित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) अधीक्षक अभियंता, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे
१९) कार्यासन अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) जलसंपदा विभाग /लाक्षेवि (कामे) कार्यासन संग्रहार्थ.